विधि व न्याय विभागांतर्गत कार्यालयीन इमारतींचे बांधकाम करण्यासाठी नवीन राज्यस्तरीय योजना सुरु करणे

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-१६२३/प्र.क्र.१३७/का-१३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १५ मार्च, २०२४

**प्रस्तावना:-**

धर्मादाय आयुक्त कार्यालय, वरळी मुंबई यांच्या कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव विधि व न्याय विभागास प्राप्त झाला आहे. परंतु सदर इमारतीच्या बांधकामाकरीता निधी अर्थसंकल्पीत करण्यासाठी विभागाकडे योजना व लेखाशीर्ष अस्तित्वात नसल्याने नवीन लेखाशीर्ष प्रस्तावित करण्यात आले. परंतु सदर इमारतीच्या बांधकामासोबतच, विधि व न्याय विभागाच्या अधिपत्याखालील सर्वच कार्यालयीन इमारतींचे बांधकाम त्यामध्ये समाविष्ट व्हावे असे धोरण ठेऊन नवीन लेखाशीर्ष “विधि व न्याय विभागाच्या कार्यालयीन इमारतीचे बांधकाम” या शीर्षाअंतर्गत प्रस्तावित करण्यात आले. सदर प्रस्तावित करण्यात आलेल्या नवीन लेखाशीर्षास मान्यता देणेबाबत नियोजन व वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. त्यावर नियोजन व वित्त विभागाने नवीन योजना प्रस्तावित करुन त्यास मंत्रिमंडळाची मान्यता प्राप्त करणेबाबत निर्देश दिले होते. त्यानुसार मंत्रिमंडळाच्या दिनांक ११ मार्च २०२४ रोजी झालेल्या बैठकीत सदर नवीन योजनेचा प्रस्ताव मान्यतेसाठी सादर करण्यात आला. सदर योजनेस मंत्रिमंडळाने मान्यता प्रदान केली आहे. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

“विधि व न्याय विभागांतर्गत कार्यालयीन इमारतींचे बांधकाम ”अशी सर्वंकष राज्य योजना खालीलप्रमाणे अंमलात आणण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

२. **योजनेचा उद्देश :-** विधि व न्याय विभागांतर्गत कार्यालयीन इमारतींचे बांधकाम करणे

३. **योजनेअंतर्गत करण्यात येणारी बांधकामे :-**

अ) नवीन कार्यालयीन इमारतींचे बांधकाम करणे
ब) कार्यालयीन इमारतीचे नुतनीकरण व संरचनात्मक दुरुस्ती करणे

**४. <u>बांधकामांचे कार्यन्वयन व लेखाशीर्ष</u> :-**

कार्यालयीन इमारतींची बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत, शासनाच्या विहीत कार्यपध्दतीनुसार करण्यात येतील.

सार्वजनिक बांधकाम विभागाने शासकीय इमारतींची बांधकामे विहीत मुदतीत व विहीत पध्दतीने करावे. सदर बाबीस विलंब झाल्यास संबंधीत अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करणात येईल.

सदर इमारतींच्या बांधकामांकरीता नवीन लेखाशीर्ष सार्वजनिक बांधकाम विभागाच्या लेखाशीर्षांतर्गत निर्माण करण्यात येईल.

**५. <u>इमारतींची देखभाल दुरुस्ती</u> :-** शासकीय इमारतींची देखभाल दुरुस्ती सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात येत आहे. त्यानुसारच प्रस्तुत योजनेअंतर्गत बांधण्यात येणाऱ्या इमारतींची देखभाल दुरुस्ती सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात येईल.

**६. <u>इमारतींच्या बांधकामाकरीता उपलब्ध करावयाची जागा</u> :-**

इमारतीच्या बांधकामाकरीता जागेची आवश्यकता भासल्यास त्याप्रमाणे शासनाकडे मागणी करण्यात येईल.

**७. <u>नियतव्ययाची उपलब्धतता:-</u>**

सदर योजना राज्य कार्यक्रमांतर्गत योजनांमध्ये प्रस्तावित करण्यात आली असून, नियोजन विभागाकडून प्राप्त होणाऱ्या वार्षिक नियतव्ययातून सदर योजनेकरीता नियतव्यय उपलब्ध करुन देण्यात येईल.

८. सदर शासन निर्णय मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक ११ मार्च २०२४ रोजी झालेल्या बैठकीत प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या <u>www.maharashtra.gov.in</u> या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३१५१५४६०२०६१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2024.03.15 15:56:26 +05'30'

**( विलास वसंत गायकवाड )**
**विधी सल्लागार-नि-सह सचिव, महाराष्ट्र शासन,**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

३) सर्व मा.मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
४) मा.सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) मा.महाधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८) मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय , मुंबई.
९) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई
१०) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, नियोजन विभाग, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) मा.धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२) मा.महाप्रशासक, व शासकीय विश्वस्त, मुंबई
१३) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य विधि सेवा प्राधिकरण, मुंबई
१४) नगरपाल, नगर दिवाणी न्यायालय, मुंबई
१५) संचालक, महाराष्ट्र न्यायिक अकादमी व भारतीय मध्यस्थी केंद्र अणि प्रशिक्षण संस्था, उत्तन, जि.-ठाणे
१६) महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणांतर्गत मुख्य सादरकर्ता अधिकारी यांचे कार्यालय
१७) संचालक, न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, नागपूर
१८) सरकारी वकील, सरकारी वकील यांचे कार्यालय, सर्व
१९) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
२०) प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
२१) उपसचिव (वित्त)/उपसचिव (नियोजन)/उपसचिव (इमारती)(सा.बां.वि.), मंत्रालय, मुंबई.
२२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, सर्व
२३) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२४) सह/उपसचिव / कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने.
२५) निवडनस्ती / संग्रहार्थ कार्यासन-१३